**शासकीय कर्मचाऱ्यांच्या पात्र कुटुंबियांना अनुकंपा नियुक्ती देण्यासाठी कमाल वयोमर्यादेचा व टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्याचा निकष सुधारित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- अकंपा-१०१०/प्र.क्र. ३०८/१०/आठ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ६.१२.२०१०

वाचा :
१. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.अकंपा-१०९५/प्र.क्र.३४-अ /आठ, दि.२३.८.१९९६
२. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.अकंपा-१०९८/प्र.क्र.०५/९८ /आठ, दि.१०.३.१९९८
३. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.अकंपा-१००४/प्र.क्र.५१/आठ, दि.२२.८.२००५
४. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.अकंपा- १००७/१२९५/प्र.क्र.१८१/आठ, दि.२३.४.२००८
५. शासन निर्णय सा.प्र.वि.क्र. निवक- १०१०/प्र.क्र.०८/१६-अ, दि.६.१०.२०१०

**प्रस्तावना** :- शासकीय कर्मचाऱ्यांसाठी असलेल्या प्रचलित अनुकंपा नियुक्ती योजनेमध्ये शा.नि.दि.२२.८.२००५ व दि.२३.४.२००८ अन्वये अनुकंपा नियुक्तीसाठी कमाल वयामर्यादा ४० वर्षे इतकी विहित करण्यात आलेली आहे. या कमाल वयोमर्यादेच्या अटीमुळे प्रतीक्षासूचीवरील उमेदवारांची नांवे नियुक्ती मिळण्यापूर्वीच वयोधिक्यामुळे वगळली जात असल्याने सदर वयोमर्यादेत वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबतच्या प्रस्तावावर सर्वकष विचार करुन अनुकंपा नियुक्तीच्या प्रचलित योजनेमधील नियुक्तीसाठी असलेल्या कमाल वयोमर्यादेची व टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण होण्यासंबंधातील सद्य:स्थितीत अस्तित्वात असलेल्या तरतूदी अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे सुधारित तरतूदी लागू करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१) शासकीय कर्मचाऱ्यांच्या पात्र कुटुंबियांना अनुकंपा नियुक्ती देण्यासाठी या आधी असलेल्या ४० वर्षे या कमाल वयोमर्यादेत वाढ करण्यात येत असून ती आता वयाची ४५ वर्षे इतकी राहील.

२) अनुकंपा तत्त्वावर लिपीक- टंकलेखक पदावर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांना टंकलेखनाचे विहित वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र प्राप्त करून घेण्यासाठी सध्या असलेली २ वर्षे ही मुदत कमी करुन ती आता नियुक्तीच्या दिनांकापासून ०६ महिने इतकी करण्यात येत आहे.

३) हे आदेश दि.६.१०.२०१० पासून लागू राहतील.

अनुकंपा नियुक्ती योजनेसंदर्भातील यापूर्वी वेळोवेळी काढलेल्या शासन निर्णयामध्ये उल्लेख केल्याप्रमाणे उपरोक्त सुधारित तरतूदी या केवळ शासकीय कर्मचाऱ्यांपूरत्याच सीमित आहेत. सदर तरतूदी या

जिल्हा परिषदा /नगर पालिका / महानगर पालिका / महामंडळे / प्राधिकरणे / व्यापारी उपक्रम व इतर तत्सम आस्थापनांवरील कर्मचाऱ्यांना थेट लागू होणार नाहीत. त्यासाठी संबंधित प्रशासकीय विभागाने स्वतंत्रपणे निर्णय घेणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०१०१२०६१६४०२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( के.पी.बक्षी )
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

मा.राज्यपालांचे सचिव, मलबार हिल मुंबई,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
*प्रबंधक , उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा / अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक , उच्च न्यायालय, मुंबई / खंडपीठ औरंगाबाद / नागपूर
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/ खंडपीठ औरंगाबाद / नागपूर
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
*सरकारी वकील, उच्च न्यायालय, (मूळ शाखा / अपील शाखा), मुंबई / खंडपीठ औरंगाबाद / नागपूर
*सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/ खंडपीठ औरंगाबाद / नागपूर
*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, (विधान परिषद), मुंबई,
*प्रोथेनेटरी अँड सिनियर मास्टर, हायकोर्ट,मुंबई
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ,
*सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे),कोकण भवन,नवी मुंबई,
महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभाग /कार्यासन क्र.१६-अ, मंत्रालय, मुंबई.
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
**निवड नस्ती.**
*पत्राने